“झाडीपट्टी नाट्य महोत्सव - २०२३”
आयोजन खर्चास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४ /प्र.क्र.६७/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ मार्च, २०२४

**वाचा :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक ४ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विदर्भ प्रदेशाला नैसर्गिक विविधतेच्या वारशाबरोबर सांस्कृतिक व वेगवेगळया कला, वेशभूषा, भाषा यांचा वारसा लाभलेला आहे. नागर रंगभूमीप्रमाणे झाडीपट्टी प्रदेशाची वेगळी ओळख असणाऱ्या आणि तेथील लोकजीवनाशी तादम्य पावणाऱ्या झाडीपट्टी नाट्य रंगभूमीचे जतन, संवर्धन तसेच उत्तेजन देण्याच्या हेतूने दृष्टीने शासनाच्या वतीने दरवर्षी झाडीपट्टी नाट्य महोत्सवाचे आयोजन करण्यात येत असते. सदर कार्यक्रम हा नियमित स्वरुपाचा असल्याने उपर्निर्दिष्ट शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने सदर महोत्सवास व त्यावरील आयोजन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा चंद्रपूर येथे आयोजित तीन दिवसीय “झाडीपट्टी नाट्य महोत्सव २०२३” कार्यक्रम व त्यावरील खर्च रुपये ६७,००,०००/- (रुपये सदुसष्ट लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२११५१९४२५२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.21 15:29:53 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४